**सन २०१९ च्या खरीप हंगामामध्ये राज्यातील दुष्काळ जाहीर झालेल्या तालुक्यांमध्ये पीक कर्जाचे पुनर्गठन व शेतीशी निगडीत कर्जाच्या वसुलीस स्थगिती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन परिपत्रक क्र. दुष्काळ-१११९/प्र.क्र.११८/१८-स,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : २२.०५.२०२०**

**वाचा** - १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१७३/म-७, दि.०७.१०.२०१७
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१७३/म-७, दि.२८.०६.२०१८
३) भारतीय रिझर्व्ह बँक, मास्टर निर्देश आरबीआय/एफआयडीडी/२०१८-१९, दि १७/१०/२०१८
४) शासन पत्र महसूल व वन विभाग, क्र. एससीवाय-२०१९/प्र.क्र.२२०/म-७, दि.२३.१०.२०१९
५) आयुक्त (कृषी), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. कृआ/नैसआ/ख.दुष्काळ/३६८/२०१९, दि.३०.१०.२०१९
६) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एससीवाय २०१९/प्र.क्र.२२०/म-७, दि.३१.१०.२०१९
७) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.कृषीपत-०२/अतिवृष्टी/ नुकसान/ कर्ज वसुली स्थगिती/२१८१/२०१९, दि.०२.११.२०१९

**प्रस्तावना :-**

दुष्काळ व्यवस्थापन संहिता २०१६ नुसार जिल्ह्यातील दुष्काळी परिस्थितीचे मुल्यांकन करण्याबाबत संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ व २ अन्वये सविस्तर कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. संदर्भाधीन शासन निर्णय व दुष्काळ व्यवस्थापन संहितेमध्ये विहीत केलेल्या निकषानुसार खरीप २०१९ च्या हंगामातील परिस्थितीच्या आधारे राज्यातील ३ तालुक्यांमध्ये दुष्काळाची दुसरी कळ लागू झाली. दुष्काळाची दुसरी कळ लागू झालेल्या ३ तालुक्यांमध्ये प्रत्यक्ष पिकांचे नुकसानीचे सर्वेक्षण (Ground Truthing) करण्यात आले असून त्या आधारे राज्यस्तरीय दुष्काळ देखरेख समितीकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार राज्यातील तालुक्यांमध्ये दुष्काळ जाहीर करून सवलती लागू करण्याबाबत वाचा येथील शासन निर्णय क्रमांक ६ अन्वये निर्देश दिले आहेत. सदर शासन निर्णयांमध्ये जाहीर केलेल्या सवलती उपाययोजनांमध्ये १) सहकारी कर्जाचे पुनर्गठन व २) शेतीशी निगडित कर्जाच्या वसुलीस स्थगिती अशा सहकारी विभागाशी संबंधित सवलती/उपाययोजनांचा समावेश आहे.

तसेच राज्यामध्ये खरीप २०१९ च्या हंगामामध्ये पीक काढणीला आलेली असताना सर्वत्र अतिवृष्टी झाल्यामुळे उभ्या पीकांचे नुकसान झालेले आहे. सध्या कर्ज वसूलीचा हंगाम सुरू असून या हंगामामध्ये कर्ज वसूली केल्यास शेतकरी अडचणीत येण्याची शक्यता आहे. सदर वस्तुस्थितीस अनुसरून कर्जाच्या वसूलीस स्थगिती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. महसूल व वन विभागाच्या वरील अ.क्र.६ येथील शासन निर्णयाच्या अनुषंगाने सहकारी कर्जाचे पुनर्गठन व शेतीशी निगडित कर्जाच्या वसुलीस स्थगिती सवलती/उपाययोजना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

सन २०१९ च्या खरीप हंगामात महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन) यांच्यामार्फत राज्यातील तालुक्यांमध्ये दुष्काळ जाहीर करून दुष्काळी भागात उपाययोजना व सवलती लागू करण्याबाबत निर्देश दिले आहेत.

२. **या परिपत्रकान्वये सूचित करण्यात येते की, संदर्भाधीन वाचा अ.क्र.६ येथे नमूद केलेल्या दि. ३१/१०/२०१९ च्या शासन निर्णयान्वये दुष्काळ जाहीर केलेल्या सोबत जोडलेल्या परिशिष्टातील २ तालुक्यांमध्ये -**

खरीप २०१९ हंगामातील शेतीशी निगडीत कर्जाच्या वसुलीस स्थगिती व अल्पमुदत पीक कर्जाचे मध्यम मुदत कर्जात (कालावधी ५ वर्ष) पुनर्गठन करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्या अनुषंगाने, राष्ट्रीयकृत बँका, व्यापारी बँका, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. व संबंधित जिल्हा मध्यवर्ती बँकांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

सुलभ संदर्भासाठी उपरोक्त शासन निर्णयाची परिशिष्टे यासोबत जोडली आहेत. संदर्भाधीन शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध आहेत.

३. खरीप २०१९ हंगामातील पीक कर्जाच्या परतफेडीचा दिनांक ३१ मार्च २०२० असल्याने वरीलप्रमाणे बाधित तालुक्यातील जे शेतकरी विहीत मुदतीत पीक कर्जाची परतफेड करू शकणार नाहीत अशा शेतकऱ्यांची संमती घेऊन खरीप २०१९ च्या हंगामातील पीक कर्जाचे व्याजासह मध्यम मुदत कर्जात ५ वर्षाच्या कालावधीसाठी पुनर्गठन करण्यात यावे.

तसेच खरीप २०१९ हंगामातील राज्यातील उपरोक्त तालुक्यातील शेतीशी निगडीत कर्जाच्या वसुलीस पुढील आदेशापर्यंत स्थगिती देण्यात येत आहे. त्या अनुषंगाने, राष्ट्रीयकृत बँका, व्यापारी बँका, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. व संबंधित जिल्हा मध्यवर्ती बँकांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

उपरोक्त तालुक्यामधील खरीप २०१९ मधील पीक कर्जाच्या पुनर्गठनाची कार्यवाही सर्व बँकांनी दि. ३१ जुलै, २०२० पर्यंत पूर्ण करावी व अशा शेतकऱ्यांना खरीप २०२० हंगामासाठी पीक कर्ज उपलब्ध करून देण्यात यावे. या शासन निर्णयाची अंमलबजावणी कटाक्षाने करण्यात येईल, याची सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे तसेच समन्वयक, राज्यस्तरीय बँकर्स समिती (SLBC) बँक ऑफ महाराष्ट्र, पुणे यांनी दक्षता घ्यावी.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२००५२२१३०४४८३६०२ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2020.05.22 14:06:01 +05'30'

( रमेश शिंगटे )
**अवर सचिव तथा सहनिबंधक, सहकारी संस्था,**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत ,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२) मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
३) मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
४) मा. विधानसभा सदस्य व विधान परिषद सदस्य (सर्व)
५) अप्पर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
६) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे

७) आयुक्त, कृषी संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) समन्वयक, राज्यस्तरीय बँकर्स समिती (SLBC) बँक ऑफ महाराष्ट्र, पुणे
१०) जिल्हाधिकारी (सर्व)
११) सह सचिव, भारत सरकार, कृषी मंत्रालय (सहकार विभाग), कृषी भवन, नवी दिल्ली.
१२) महाव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक, प्रादेशीक कार्यालय, पुणे
१३) मुख्य अधिकारी, आर.बी. आय., ॲग्रिकल्चरल क्रेडीट डिपार्टमेंट, सेंट्रल ऑफीस, गारमेंट हाऊस, मुंबई १८
१४) उप मुख्य अधिकारी, आर.बी.आय., ॲग्रिकल्चरल क्रेडीट डिपार्टमेंट, सेंट्रल ऑफीस, गारमेंट हाऊस, मुंबई १८
१५) विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था. (सर्व)
१६) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था. (सर्व)
१७) कार्यकारी संचालक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक (सर्व)
१८) प्रशासक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, मुंबई
१९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२०) सर्व कार्यासने, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२१) निवड नस्ती - १८-स

सन २०१९ च्या खरीप हंगामामध्ये राज्यातील तालुक्यांमध्ये दुष्काळ घोषित करणेबाबत ....

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांक: एससीवाय - २०१९/प्र.क्र. २२०/म-७**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक: ३१ ऑक्टोबर, २०१९

वाचा:- १) शासन निर्णय,क्रमांक: संकिर्ण-२०१७/प्र.क्र.१७३/२०१७/म-७, दि. ७ ऑक्टोबर, २०१७

२) शासन निर्णय,क्रमांक: संकिर्ण-२०१७/प्र.क्र.१७३/२०१७/म-७,दि. २८ जून, २०१८

३) शासन पत्र क्रमांक: एससीवाय-२०१९/प्र.क्र. २२० /म-७, दि. २३ ऑक्टोबर,२०१९

४) आयुक्त (कृषी),महाराष्ट्र राज्य पुणे यांचे क्रमांक कृआ/नैसआ/ख.दुष्काळ/३६८/२०१९ दिनांक ३०.१०.२०१९ चे पत्र

**प्रस्तावना :**

दुष्काळ व्यवस्थापन संहिता २०१६ नुसार जिल्हातील दुष्काळी परिस्थितीचे मुल्यांकन करण्याबाबत संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ व २ अन्वये सविस्तर कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. संदर्भाधीन शासन निर्णय व दुष्काळ व्यवस्थापन संहितेमध्ये विहित केलेल्या निकषानुसार खरीप २०१९ च्या हंगामातील परिस्थितीच्या आधारे राज्यातील ३ तालुक्यांमध्ये दुष्काळाची दुसरी कळ लागू झाली. दुष्काळाची दुसरी कळ लागू झालेल्या ३ तालुक्यांमध्ये प्रत्यक्ष पिकांचे नुकसानीचे सर्वेक्षण ( Ground Truthing) करण्यात आले असून त्या आधारे राज्यस्तरीय दुष्काळ देखरेख समितीकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार राज्यातील तालुक्यांमध्ये दुष्काळ घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील तालुक्यांमध्ये जून ते सप्टेंबर या कालावधीतील पर्जन्याची तूट, उपलब्ध असलेल्या भूजलाची कमतरता, दूरसंवेदन विषयक निकष, वनस्पती निर्देशांक, मृदू आर्द्रता , पेरणीखालील क्षेत्र व पीकांची स्थिती या सर्व घटकांचा एकत्रित विचार करून या घटकांनी प्रभावित झालेल्या तालुक्यामध्ये आपत्तीची शक्यता विचारात घेवून राज्य शासन परिशिष्ट "अ" येथे नमूद केलेल्या २ तालुक्यांमध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे दुष्काळ जाहीर करीत आहे.

२. दुष्काळ घोषित करण्यात येत असलेल्या २ तालुक्यांमध्ये खालील सवलती लागू करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे :

१) जमीन महसूलात सूट.

२) पिक कर्जाचे पुनर्गठन.

३) शेतीशी निगडीत कर्जाच्या वसूलीस स्थगिती.

४) कृषी पंपाच्या चालू विजबिलात ३३.५% सूट.

५) शालेय/महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या परिक्षा शुल्कात माफी.

६) रोहयो अंतर्गत कामाच्या निकषात काही प्रमाणात शिथिलता.

(७) आवश्यक तेथे पिण्याचे पाणी पुरविण्यासाठी टँकर्सचा वापर.

(८) टंचाई जाहीर केलेल्या गावात शेतकऱ्यांच्या शेतीच्या पंपाची वीज जोडणी खंडीत न करणे.

३. या आदेशान्वये देण्यात येणाऱ्या विविध सवलतीपोटीचा आर्थिक भार संबंधित प्रशासकीय विभागांनी उचलावा व त्यासाठी आवश्यक निधी उपलब्ध करून द्यावा. त्यानुसार या प्रकरणी पुढील उचित कार्यवाही करून केलेल्या कार्यवाहीचा अनुपालन अहवाल या विभागास सादर करण्यात यावा.

४. सदर तालुक्यातील खातेदारांना कृषी विषयक मदतीसाठी निविष्ठा अनुदान अनुज्ञेय राहील. सदर निविष्ठा अनुदान हे कोरडवाहू पिक उत्पादित केलेल्या व ३३ टक्केपेक्षा जास्त नुकसान झालेल्या खातेदारांना अनुज्ञेय राहील. निविष्ठा अनुदान देण्यासाठी लाभार्थ्यांची निवड करताना शासन निर्णय दिनांक ३.११.२०१५ मधील परिच्छेद क्रमांक १४ मध्ये विहित केलेली कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी. निविष्ठा अनुदानाचे दर व इतर अटी व शर्ती या शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०१५/प्र.क्र.४०/म-३, दिनांक १३ मे, २०१५ मध्ये नमूद केल्यानुसार राहतील. तसेच निविष्ठा अनुदान हे नुकसान झालेल्या प्रत्यक्ष पीक पेरणी केलेल्या क्षेत्रापुरतेच मर्यादित राहील याची दक्षता घ्यावी.

५. सदर मदतीचे वाटप सन २०१९ च्या खरीप हंगामातील ७/१२ मधील पिकांच्या नोंदीच्या आधारे करण्यात यावे.

६. हंगामातील अंतिम पैसेवारीसाठी करण्यात आलेल्या पिक कापणी प्रयोगाअंती आलेल्या पिक निहाय पैसेवारीच्या आधारे कोरडवाहू पीकांचे ३३ टक्के नुकसान ठरविण्यात यावे. प्रमुख पिक नसलेल्या व पिक कापणी प्रयोग न केलेल्या कोरडवाहू पिकांना सुध्दा मदत अनुज्ञेय राहील.

७. बहुवार्षिक फळपिके व बागायती पिके यांचे ३३ टक्केपेक्षा जास्त नुकसान झाल्याची शहनिशा शेतीनिहाय पंचनामे करून करण्यात यावे.

८. बहुवार्षिक फळपिके व बागायती पिकांचे नुकसान ठरविण्याचा निकष ७/१२ मधील नोंद हा असेल.नुकसानीची तीव्रता ठरविण्यासाठी पंचनामा हा निकष असेल.बहुवार्षिक फळपिके व बागायती पिकांचे नुकसान ठरविण्यासाठी त्याची नोंद ७/१२ मध्ये असणे आवश्यक आहे.

९. सन २०१९ च्या खरीप हंगामातील पिक पाहणी मधील पिकांच्या ७/१२ मधील उताऱ्यातील नोंदीबाबत कोणताही आक्षेप उद्भवल्यास त्याचे निराकरण महाराष्ट्र जमीन महसूल संहितेमधील तरतूदीनुसार करण्यात यावे.

१०. दुष्काळ घोषित करण्यात आलेल्या तालुक्यांमधील शाळांमध्ये मध्यान्ह भोजन योजना दिर्घ सुट्टीच्या कालावधीत देखील राबविण्यात यावी. तसेच मध्यान्ह भोजन योजना व एकात्मिक बालविकास योजनेतंर्गत ( ICDS ) मुलांना पौष्टीक अन्न देण्यात यावे.

११. सदरहू आदेश हे प्रशासकीय मान्यतेचे असून निधी वितरणाबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

१२. दुष्काळ घोषित केल्याचे आदेश दिनांक १ डिसेंबर २०१९ पासून अंमलात येतील व शासनाने हे आदेश रद्द न केल्यास पुढील ६ महिन्यांच्या कालावधी पर्यंत लागू राहतील. संबंधित जिल्हाधिकारी यांनी या आदेशास जिल्हयामध्ये प्रसिध्दी द्यावी. तसेच संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना दुष्काळ घोषित केलेल्या तालुक्यांमध्ये आवश्यक उपाययोजना अंमलात आणण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी तातडीने आवश्यक उपाययोजना अंमलात आणाव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१०३११५२५५६०५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: CN = Subhash Hanmant Umaranikar C = IN S = Maharashtra O = Government Of Maharashtra, OU = Revenue and Forest Department
Date: 2019.10.31 15:28:43 +05'30'

**( सुभाष उमराणीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,मलबार हिल,मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई
३) सर्व मा. लोकसभा सदस्य/राज्यसभा सदस्य (महाराष्ट्रातील)
४) सर्व मा. विधानसभा सदस्य/विधान परिषद सदस्य,
५) मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
६) मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय,मुंबई,
७) अपर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई,
८) सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई,
९) सचिव (मदत व पुनर्वसन), महसुल व वन विभाग, मंत्रालय , मुंबई
१०) अपर मुख्य सचिव ( महसुल ), महसुल व वन विभाग, मंत्रालय , मुंबई
११) अपर मुख्य सचिव ( पाणी पुरवठा व स्वच्छता ), पाणी पुरवठा विभाग, मंत्रालय , मुंबई
१२) प्रधान सचिव ( उद्योग, ऊर्जा व कामगार ), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय , मुंबई
१३) प्रधान सचिव ( सहकार ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय , मुंबई
१४) प्रधान सचिव ( जलसंपदा ), जलसंपदा विभाग, मंत्रालय , मुंबई
१५) सचिव ( मृदु व जलसंधारण ), मृदु व जलसंधारण विभाग, मंत्रालय , मुबई
१६)आयुक्त (कृषी) , कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१७) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१८)महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

१९) सर्व विभागीय आयुक्त,

२०) सर्व जिल्हाधिकारी

२१) सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी

२२) वित्त विभाग (व्यय-९/ अर्थसंकल्प/अर्थोपाय ), मंत्रालय, मुंबई

२३) सर्व सहसचिव / उपसचिव, कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई,

२४) सह सचिव तथा वित्तिय सल्लागार, मदत व पुनर्वसन, नवीन प्रशासन इमारत

२५) महसूल व वन विभाग, कार्यासन क्रमांक म-३/म-११

२६) निवडनस्ती (कार्यासन म-७).

शासन निर्णय, क्रमांक: एससीवाय-२०१९/प्र.क्र. २२०/म-७, दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१९ चे

परिशिष्ट "अ"

सन २०१९ खरीप हंगामातील दुष्काळ घोषित केलेल्या तालुक्यांची नावे

| अ.क्र. | जिल्हा | गंभीर/मध्यम स्वरुपाचा दुष्काळ घोषित करण्यात येत असलेल्या तालुक्यांची नावे | संख्या |
|---|---|---|---|
| १ | बीड | आंबेजोगाई --गंभीर | १ |
| २ | उस्मानाबाद | परांडा -- मध्यम | १ |
| **एकूण २ जिल्हे** | | **गंभीर/मध्यम दुष्काळ असलेल्या तालुक्यांची एकूण संख्या** | २ |

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: CN = Subhash Hanmant Umaranikar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue and Forest Department
Date: 2019.10.31 15:29:08 +05'30'

(सुभाष उमराणीकर)

उप सचिव, महाराष्ट्र शासन